**महाराष्ट्र राज्य अनुसुचित जाती जमाती आयोगावरील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीबीसी-१०/२००६/प्र.क्र. ५७६ / मावक**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२.
दिनांकः १७ फेब्रुवारी, २०१७

**वाचाः-** १) शासन निर्णय, सामाजिक न्याय विभाग व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः-रामाअ-००३/प्र.क्र.१७५/मावक-१, दि. १ मार्च, २००५.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय विभाग व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः- सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक ५, दि. २ डिसेंबर, २००६
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय विभाग व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः-सीबीसी-१०/२००८/प्र.क्र.३३/मावक ५, दि. १ जुलै, २००९
४) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः-सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक ५, दि. २५ मार्च,२०१०
५) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः-सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक ५, दि. १६ मार्च, २०११
६) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः-सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक ५, दि.३१ मार्च, २०१२
७) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः-सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक ५, दि. १ एप्रिल, २०१३
८) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः-सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक ५, दि. ३ मार्च, २०१४
९) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः-सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक ५, दि. ११ मार्च, २०१५
१० ) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः-सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक ५, दि. ३१ मार्च, २०१६

**प्रस्तावनाः-**

अनुसूचित जाती जमातीच्या सामाजिक, शैक्षणिक व आर्थिक, सांस्कृतिक व राजकीय सद्यस्थितीचा अभ्यास करून शासनास उपाययोजना सूचविण्यासाठी सामाजिक न्याय विभागाच्या दि. १/३/२००५ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र अनुसूचित जाती/ जमाती आयोगाची स्थापना करण्यात आली. सदर आयोगावरील अध्यक्षांबरोबरच आयोगाची मुदत दिनांक ३० जुन, २००९ रोजी संपुष्टात येणार होती. तथापि सदर आयोगामार्फत शासनास काही अहवाल सादर करावयाचे असल्याने सदर आयोगास संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आलेली आहे. त्यास अनुसरून आयोगाच्या पदांना सुध्दा वेळोवेळी संदर्भाधिन पत्रान्वये मुदत वाढ देण्यात आलेली आहे. सद्यःस्थितीत सदर पदांना माहे मार्च, २०१७ ते माहे फेब्रुवारी, २०१८ पर्यंत मुदतवाढ देणे विचाराधीन आहे.

**शासन निर्णयः-**

राज्य अनुसूचित जाती/ जमाती आयोगाकरीता अधिकारी/कर्मचारी वर्गाची मंजूर ५३ पदापैकी विवरणपत्रात दर्शवलेली २७ पदे प्रथम टप्प्यात भरण्यास दिनांक २ डिसेंबर २००६ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर एकूण २७ अस्थायी पदांना दि. ०१/०३/२०१६ ते दि. २९/०२/२०१७ पर्यंत किंवा शासनाने पुढील आदेश होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भ क्र. १० येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. आता आयोगाच्या सदर २७ अस्थायी पदांना दि. ०१/०३/२०१७ ते दि. २८/०२/२०१८ पर्यंत किंवा शासनाने पुढील आदेश होईपर्यंत जे आधी घडेल तोपर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या पदावरील येणारा खर्च सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतुदीमधून " मागणी क्रमांक एन-३, २२२५-अनुसूचित जाती अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१ अनुसूचित जातीचे कल्याण, ८०० इतर खर्च (०१) (०३) महाराष्ट्र राज्य अनुसुचित जाती आयोग (२२२५-४०७-१) " या लेखाशिर्षातंर्गत भागविण्यात यावा.

३. हे आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्रमांकः असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२) /२००४/वित्तिय सुधारणा-१, दि. ४/१०/२००४ मधील तरतुदीच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०१७०३०३११४३२७०६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2017.03.06 11:45:27 +05'30'

**( दि. रा. डिंगळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अध्यक्ष/उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी, फेस, मुंबई ४०००१८
२) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी, फेस, मुंबई ४०००१८
३) वरीष्ठ संशोधन अधिकारी, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी, फेस, मुंबई ४०००१८
४) आयुक्त समाजकल्याण , महाराष्ट्र राज्य, पुणे
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेता / लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) निवासी व लेखा अधिकारी, मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९) निवड नस्ती, मावक.

# विवरणपत्र

शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः सीबीसी १०/२००६/प्र.क्र.५७६/मावक
दिनांकः- १७ फेब्रुवारी, २०१७

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी पदांची संख्या | वेतनश्रेणी (रूपये) |
|---|---|---|---|
| १. | सदस्य सचिव (सह सचिव दर्जा) | १ | १५६००-३९१०० |
| २. | सह संचालक (उप सचिव दर्जा) | १ | १५६००-३९१०० |
| ३. | अतिरिक्त पोलीस अधिक्षक | १ | १५६००-३९१०० |
| ४. | वरीष्ठ संशोधन अधिकारी | १ | १५६००-३९१०० |
| ५. | पोलिस निरिक्षक | २ | ९३००-३९१०० |
| ६. | स्वीय सहाय्यक | १ | ९३००-३४८०० |
| ७. | संशोधन सहाय्यक | २ | ९३००-३४८०० |
| ८. | लघुलेखक उच्चश्रेणी | २ | ९३००-३४८०० |
| ९. | कार्यालयीन अधिक्षक | १ | ९३००-३४८०० |
| १०. | सांख्यिकी अधिकारी | १ | ९३००-३४८०० |
| ११. | सहाय्यक लेखा अधिकारी | १ | ९३००-३४८०० |
| १२. | सहाय्यक (विधी) | १ | ९३००-३४८०० |
| १३. | लघुलेखक (निम्नश्रेणी) | १ | ९३००-३४८०० |
| १४. | वरीष्ठ सहाय्यक | २ | ५२००-२०२०० |
| १५. | लिपिक टंकलेखक | २ | ५२००-२०२०० |
| १६. | बिल लिपीक | १ | ५२००-२०२०० |
| १७. | वाहन चालक (कंत्राटी) | २ | ५२००-२०२०० |
| १८. | शिपाई | ४ | ४४४०-७४४० |
| | एकूण | २७ | ---- |

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2017.03.06 11:47:00 +05'30'

( दि.रा. डिंगळे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन